संचालनालय अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांकरीता "छात्रमानस योजना" राबविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

**शासन निर्णय क्रमांकः कंत्राटी-०६२४/प्र.क्र.२३५/प्रशा-२**

गो.ते. रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०८ ऑगस्ट २०२४

वाचा :-

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियमभाग-२, दिनांक १७.०४.२०१५
२. शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः क्र. मानसेवी-२०२४/प्र.क्र.४६/२४/वैसेवा-२, दिनांक १४.०३.२०२४
**३.** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवसं/मानसिक आरोग्य सबलीकरण/शैवि/२०२४/४०३७, दिनांक २१.०३.२०२४

प्रस्तावना:-

वैद्यकीय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राज्यातील सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये खूप मोठ्या प्रमाणात पदवी व पद्व्युत्तर शिक्षण घेणारे विद्यार्थी आहेत. सदर विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण देण्यासाठी शासन नेहमीच प्रयत्नशील आहे. सध्याच्या अतिवेगवान डिजीटल युगात दैनंदिन वाढत्या स्पर्धेमुळे मानवी जीवनात नवनविन समस्या निर्माण होत आहेत. त्या समस्यांचा परिणाम सर्व वयातील व्यक्तींच्या शारीरिक व मानसिक आरोग्यावर होत आहे. यामध्ये शारीरिक विकारांची लक्षणे दर्शनीय असल्याने त्यावर उपचार केला जातो. परंतु मानसिक विकारांची लक्षणे बरेचदा अदृश्य किंवा काही वेळी सहज दुर्लक्षित करता येण्यासारखी असल्याने त्यांवर वेळीच उपचार होत नाही. परिणामी त्याचे गंभीर दुष्परिणाम सामोरे येतात. त्यामध्ये डिप्रेशनमध्ये जाणे, अबोल होणे व काळी वेळा आत्महत्या करणे यांचा समावेश होतो. असे दुष्परिणाम टाळण्यांकरीता मानसिक विकारांचे वेळीच निदान झाल्यास, समुपदेशन व काही उपचार पध्दतींने त्या व्यक्तीस मानसिक विकारातुन पुर्णपणे मुक्त होऊन एक आनंददायी जीवन जगण्यांस मदत होते. मानसिक विकारांमध्ये रुग्णाचे समुपदेशन ही पहिली पायरी असून ते वेळीच झाल्यास रुग्णास खूप मदत होते. ही बाब विचारात घेता, संचालनालय अधिपत्याखालील संस्थेत वैद्यकीय शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांचे मानसिक आरोग्य सबलीकरण करण्याकरीता प्रत्येक शासकीय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये कंत्राटी तत्वावर २ मानसोपचार समुपदेशक नियुक्त करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ४ वरील दिनांक २१.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने, संचालनालय

अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांकरीता मानसोपचार समुपदेशक कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांच्या मानसिक आरोग्य सबलीकरणाकरीता "छात्रमानस योजना" राबविण्यास व सदर योजनेंतर्गत प्रत्येक शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात "छात्रमानस कक्ष" सुरु करण्यास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती -</u>

१) संचालनालयाच्या अधिपत्याखालील संस्थेत वैद्यकीय शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांचे मानसिक आरोग्य सबलीकरण करण्यासाठी छात्रमानस योजनेंतर्गत उपायोजना करण्यासाठी तसेच योजनेचा नियमितपणे आढावा व मूल्यमापन करण्याकरीता खालील प्रमाणे राज्यस्तरीय समिती गठीत करावी.

   १) प्राध्यापक (मानशशास्त्र)- अध्यक्ष
   २) सहयोगी प्राध्यापक (मानशशास्त्र) - सदस्य
   ३) समाजसेवा अधीक्षक - सदस्य सचिव

   सदर समितीमध्ये आवश्यकतेप्रमाणे सदस्यवाढ करण्याचे अधिकार आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांना राहतील.

२) उक्त समितीने वेळोवेळी तथा आवश्यकतेनुसार सर्व संस्थामध्ये विद्यार्थ्यांचे समुपदेशन करण्यासाठी वार्षिक कार्यक्रमाची रुपरेषा तयार करावी. ज्यामध्ये विद्यार्थ्यांसाठी हेल्पलाईन सुविधा, नामांकित तज्ज्ञांचे मार्गदर्शन करण्यासाठी व्याख्यान आयोजित करणे, सेवाभावी संस्थाचा सदर योजनेत समावेश करणे, विद्यार्थी व शिक्षकांशी संवाद साधने इत्यादी बाबींचा समावेश करावा. तसेच, राज्यस्तरीय समितीने सदर कार्यक्रमाच्या वेळोवेळी आढावा घेऊन त्याचा तिमाही अहवाल आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांना सादर करावा.

३) संचालनालयाच्या अधिनस्त प्रत्येक शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील समाजसेवा विभागातंर्गत "छात्रमानस कक्ष" सुरु करण्याकरीता २ मानसोपचार समुपदेशकांची नियुक्ती कंत्राटी पध्दतीने अधिष्ठता स्तरावर करण्यात येईल. समुपदेशकांना शैक्षणिक अर्हता (एम.एस.डब्ल्यु/एम.ए. (मानशशास्त्र)/कौन्सिलिंग डिप्लोमा) धारण करणे आवश्यक राहील. समुपदेशनाचा किमान एक वर्षाचा अनुभव असणा-यास उमेदवारास प्राधान्य असेल.

४) मानसोपचार समुपदेशक यांची नेमणूक तात्पुरत्या स्वरुपाची प्रतिमाह रु.३०,०००/- इतक्या एकत्रित मानधनावर ११ महिन्यांच्या कालावधीसाठी असेल. तसेच, आवश्यकेतनुसार ही मुदत दिलेल्या कालावधीपूर्वी संपुष्टात आणण्याचे अधिकार संबंधित संस्थेच्या अधिष्ठाता यांना राहील. सदर नियुक्त्या मानधन तत्वावर होणार असल्याने निवड झालेल्या उमेदवारांना कायमस्वरुपी नियुक्तीकरीता हक्क सांगता येणार नाही.

५) सदर मानसोपचार समुपदेशकांच्या सेवाचा जास्तीत जास्त लाभ विद्यार्थ्यांना घेता यावा याकरीता संबंधित अधिष्ठाता यांनी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

६) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाने सदर कार्यक्रमाचा वेळोवेळी आढावा घ्यावा. तसेच, सदर कार्यक्रमाच्या परिणामकारकतेचे मूल्यांकन करुन सहामाही अहवाल शासनास सादर करावा.

७) सदर शासन निर्णयानुसार नियुक्त मानसपोचार समुपदेशक यावर होणारा खर्च संबंधित संस्थेच्या महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या निधीमधून उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०८१३५८१८५८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2024.08.08 15:02:02 +05'30'

**( म.गि.जोगदंड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता (सर्व), शासकीय वैद्यकीय महाविद्यालय.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. निवडनस्ती (प्रशा-२).